GR 200408131723550001-1700

गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रम बांधकाम नियमाबाबत.

महाराष्ट्र शासन
गृहनिर्माण विभाग,
शासन निर्णय क्र. गवसु १०२०/८७(भाग-२)/झोपसु-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: ५ जून, २००२

**वाचा:- १) क्रमांक गवसु १०९१/२८९७/का.७, दि. ४ जानेवारी, १९९२**
**२) क्रमांक गवसु १०९१/२८९७/का.७, दि. ५ डिसेंबर, १९९५**

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र शासनाने १९७२/७३ पासून गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रमाची अंमलबजावणी अंगीकारली आहे. गलिच्छवस्ती सुधार कार्यक्रम हा २० कलमी कार्यक्रमाचा एक महत्वाचा भाग आहे. गलिच्छवस्तीत राहणाऱ्या लोकांचे राहणीमान उंचावण्याच्या दृष्टीने शासनाने अनेक पुरोगामी निर्णय घेतलेले आहे. गलिच्छवस्तीत राहणाऱ्या लोकांची घरे सुस्थितीत, सुरक्षित व मजबूत असावीत म्हणून अनेक लोकप्रतिनिधींनी तसेच सामाजिक संस्था यांनी शासनाकडे झोपडयांची उंची आणि बांधकामाचे नियम यात सुधारणा करण्यात यावी अशा मागण्या केलेल्या होत्या. या अनुषंगाने मा. मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखाली दि. १९.११.२००१ रोजी झालेल्या उच्चाधिकार समितीच्या बैठकीत सर्वकष चर्चा होऊन झोपडपट्टीतील पात्र झोपडीची उंची विहित अटी व शर्तीवर १४ फुटा पर्यन्त वाढविण्यास परवानगी देण्याबाबत निर्णय घेण्यात आला. उच्चाधिकार समितीच्या या बाबतच्या शिफारशीचा विचार करुन शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय

बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील पात्र झोपडयांची ऊंची १४ फूटापर्यंत वाढविण्यास खालील अटी व शर्तीना अधीन राहून परवानगी देण्यात यावी.

१. झोपडीधारकाने पोटमाळा बनविल्यास तो अन्य व्यक्तीला भाडयाने देवू नये. भाडयाने दिल्यास पोटमाळयाचे निष्कासन करण्यात येईल.
२. झोपडीची १४ फूट पर्यंत उंची वाढवून पोटमाळा बांधला तरी त्या झोपडीला एकच फोटोपास देण्यात यावा.
३. फक्त पात्र निवासी झोपडीस १४ फूट पर्यंत ऊंची वाढविण्यास परवानगी देण्यात यावी.



[कृ.मा.प.-

४. पोटमाळा बांधण्याची परवानगी देताना झोपडीच्या भिंती मजबूत आहेत याची संबंधित प्राधिकरणाने खात्री करुन घ्यावी.

५. झोपडीचे क्षेत्र २२५ चौ.फू. पेक्षा जास्त असल्यास अशा झोपडीची ऊंची वाढविण्यास परवानगी देण्यात येवू नये

६. १४ फूट पर्यंत झोपडीची ऊंची वाढविण्यास परवानगी मिळाली असली तरीही तो झोपडीधारक झोपडपट्टी पुनर्वसन योजनेमध्ये एकच सदनिका मिळण्यास पात्र राहील.

७. १४ फूट पर्यंत झोपडीची ऊंची वाढविण्याबाबत सन १९९५ पुर्वीच्या व पात्र निवासी झोपडयांचा विचार करण्यात यावा.

८. झोपडीची ऊंची वाढविण्यास व पोटमाळा बांधल्यास पोट माळयावर जाण्यासाठी झोपडीतूनच जीना असावा.

९. वरील अटींच्या पुर्ततेच्या संबंधाने झोपडीधारकांकडून इंडेमनिटी बाँड ( हमी पत्र ) घ्यावा.

पात्र झोपडीची ऊंची १४ फूट पर्यंत वाढविण्यास परवानगी देण्याचे अधिकार संबंधित महानगरपालिका/ नगरपालिका/परिषद यांचे राहतील. या शासन निर्णयानुसार झोपडीचे बांधकाम हे सुरक्षित व मजबूत असावे यादृष्टीने ४ 1/2 इंच रुंदीच्या भिंती ऐवजी ९ इंच रुंदीच्या बांधकामास शासन परवानगी देत आहे. गणना आणि घोषित झालेल्या गलिच्छवस्तीतील संरक्षणास पात्र असलेल्या एखाद्या झोपडीच्या दुरुस्तीसाठी अर्जदारास दुरुस्तीची परवानगी देण्यास हरकत नाही आणि अशा प्रकारे दुरुस्तीची परवानगी देताना अर्जदाराचे झोपडी गणना मोहीम-२००० अंतर्गत देण्यात आलेले ओळखपत्र हा पुरावा म्हणून अधिकृत मानण्यात यावा. आणि जर ओळखपत्र नसेल तर दि. १.१.१९९५ किंवा त्यापुर्वीच्या मतदार यादीतील संबंधित झोपडीधारकाचा अधिकृत उतारा ग्राहय मानून अशा अर्जदारास त्याच्या झोपडीच्या दुरुस्तीची परवानगी देण्यात यावी.

या शासन निर्णयातील तरतुदी जागतिक बँक प्रकल्प व राजीव गांधी झोपडपट्टी सुधार व निवारा प्रकल्प या योजनांखाली कार्यान्वित केलेल्या झोपडपट्टी सुधार कार्यक्रमांलाही लागू राहतील.

या शासन निर्णयातील आदेश हे तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

५/६/०२

( ल. दा. व्यास )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

H-370 (1000-06-02) 1a